# महाराष्ट्र शासन

**जलदगती डाकेद्वारे**
**(By Speed Post)**

**क्रमांकः** मोसाअ-१०११(१)/(प्र.क्र. १८/११)पाच,
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :** २५ मे, २०११.

**प्रति,**

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

**विषय :- सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षात मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत.**

**महोदय,**

विषयांकित प्रकरणी आदेशावरुन मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता आपणांस कळविण्यात येते की, मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३६, १३७ व १३९ च्या अधिन राहून **२०११-२०१२** या वित्तीय वर्षाकरिता, अर्जदाराच्या संबंधित कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने, सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या **४६** अर्जदारांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे **एकूण रुपये २०,१०,०४०/- (एकूण रुपये वीस लाख दहा हजार चाळीस फक्त)** इतकी रक्कम मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम म्हणून प्रमाणित करण्यात येत आहे.

२. अर्जदारांनी मोटार वाहने खरेदी केल्यास त्यांच्या कार्यक्षमतेत वाढ होईल याची खात्री झाल्यांनतरच अग्रिम मंजूर करण्यात यावे.

३. याद्वारे प्रमाणित केलेले अग्रिम शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम-१०९९/प्र.क्र.३/९९/विनियम, दिनांक ९/७/१९९९ व क्रमांक अग्रिम-१००५/प्र.क्र.१८/२००५/विनियम, दि.२० जून, २००५ मधील तरतूदींच्या व अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात यावे.

a) वाहनाच्या मॉडेलचे नाव, उत्पादनाचे वर्ष, खरेदीची तारीख व खरेदी पावती/बील व नोंदणीचे कागदपत्र सादर करण्यात यावेत.

b) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घ्यावी.

c) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड शासनाकडे तारण ठेवली पाहिजे.

d) एकदा अग्रिम दिल्यानंतर त्यानंतरच्या पाच वर्षामधील काळात मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड व अपंग राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी स्वयंचलित तीन चाकी सायकल या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही.

e) संबंधित अर्जदारास अग्रिम प्रदान करण्यात आल्यानंतर वाहन खरेदीबाबतचे तसेच वाहन गहाण ठेवण्याबाबतचे कागदपत्र एक महिन्याच्या कालावधीमध्ये शासनास सादर करणे आवश्यक आहे. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक सुचना

देण्यात याव्यात. अन्यथा सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दिनाक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

४. अर्जदाराच्या सेवानिवृत्तीचा दिनांक लक्षात घेऊन जर अर्जदार सदर अग्रिमास पात्र ठरत असेल, तर **अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार अनुदान उपलब्ध असेल तोपर्यंत** उपरोक्त अग्रिम धन मंजुरीचे आदेश काढण्यात यावेत. अन्यथा हे प्राधिकारपत्र मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३३ च्या तरतूदीनुसार अग्राहय होईल.

५. अर्जदाराची एकूण अग्रिम वजाती त्याच्या वेतनाच्या ५० टक्केपेक्षा जास्त असता कामा नये.

६. अर्जदार खरेदी करणार असलेल्या मोटार वाहनाची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास ताबडतोब परत केली जाईल याची काळजी घ्यावी व त्याबाबत शासनास अवगत करण्यात यावे.

७. हा खर्च "मागणी क्र.जे-५-७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे-(योजनेतर/दत्तमत) २०२ (००) (०१) मोटार वाहने खरेदी अग्रीमे (लेखाशीर्ष संकेतांक ७६१० ०४८ १) या शीर्षाखाली २०११-२०१२ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या लेखानुदानातून भागविण्यात यावा.

८. मोटार वाहने खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे २०२-मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०२ ४००) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज ००४९ व्याजाच्या जमा रकमा ८०० इतर जमा रकमा (००४९ ००६ १००) (४६) (२) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा या जमाशीर्षाखाली जमा करावी.

९. हे अग्रिम धन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास त्वरीत पाठविण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष कोषागारातून अग्रिम काढल्याचा दिनांक आणि त्यासंबंधीचा प्रमाणक क्रमांक ही शासनास कळविण्यात यावा. तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१०. **नवीन मोटार सायकल** अग्रिम वसूली **६० समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह,** तर **स्कूटर अग्रिम** वसूली **४८ समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह** वसूल करण्यात यावी. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम १०९९/प्र.क्र.१६/९९/विनियम, दिनांक १०/३/२००० मधील परिच्छेद २(आ) (२) अनुसार नवीन **मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची १०० समान मासिक हप्त्यात** वसूली करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ६० हप्त्यात** करावी.

**मात्र,** एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे १६० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

तसेच परिच्छेद २(इ)(२) अनुसार **जुनी मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची वसूली ५० समान मासिक हप्त्यात** करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ३० हप्त्यात** करावी. मात्र एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे ८० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

११. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र व खरेदीखताची प्रत आणि गहाणखताची प्रत या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावी.

१२. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित कर्मचारी/अधिकारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन करण्यात याव्यात.

१३. संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

१४. जर काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास कळविण्यात यावे.

१५. आपल्या कार्यालयातील अर्जदारास त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या रकमे इतकेच अग्रिम धन मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

१६. हे पत्र निधी उपलब्धतेचे प्रमाणपत्र आहे.

आपला,

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**प्रत-माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सह सचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद,
प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद,
प्रबंधक, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती, उस्मानाबाद, धुळे, बुलढाणा, अहमदनगर, सांगली, परभणी, भंडारा, रत्नागिरी, नांद्रेड, वर्धा, सातारा,
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती, उस्मानाबाद, धुळे, बुलढाणा, अहमदनगर, सांगली, परभणी, भंडारा, रत्नागिरी, नांदेड, वर्धा, सातारा, औरंगाबाद,
विधी व न्याय विभाग (कार्यासन ८, २३ व २४),
वित्त विभाग (अर्थसंकल्प १०)
निवड नस्ती.

## शासन पत्र क्रमांक मोसाअ-१०११(१)/(प्र.क्र.१८/११)/पाच, दिनांक २५ मे, २०११ चे सहपत्र

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.आर.ए. मांडवगड, लिपिक | सहसचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २ | श्री.आर.व्ही. टापरे, लिपिक टंकलेखक | सहसचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३ | श्री.पी.व्ही. देशमुख, लघुलेखक | जि.व स.न्या. अमरावती | नवीन मोटार सायकल | ३६००० | मागणीनुसार |
| ४ | श्री.एम.एम. वाघ, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. अमरावती | नवीन मोटार सायकल | ४१००० | मागणीनुसार |
| ५ | श्रीमती के.आर. खाडे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. अमरावती | नवीन होन्डा ॲक्टीव्हा | २८००० | नियमानुसार |
| ६ | श्री.एस.बी. गुरव, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. अमरावती | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ७ | श्री.व्ही.पी. कुलकर्णी, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ८ | श्री.बी.बी. शिरसाठ, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ९ | श्री.व्ही.जी. भावसार, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. धुळे | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| १० | श्री.ई.के. जवंजाळकर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ११ | श्री.व्ही.एस. कुलकर्णी, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १२ | श्री.बी.एम. पवार, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. अहमदनगर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १३ | श्री.जी.एच. गुणारी, मुख्य बेलिफ | जि.व स.न्या. सांगली | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १४ | श्री.डी.एच. बुद्रुक, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. परभणी | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १५ | श्री.एस.एस. अमिलकंठवार, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. परभणी | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| १६ | श्री.के.एफ. देशकर, मुख्य बेलिफ | जि.व स.न्या. भंडारा | नवीन मोटार सायकल | ४३७०० | मागणीनुसार |
| १७ | श्री.एन.एम. हेडाऊ, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. भंडारा | नवीन होन्डा ॲक्टीव्हा | २८००० | नियमानुसार |
| १८ | श्री.एस.के. नागरे, वाहन चालक | प्रबंधक, उच्च न्यायालय (अ.शा.),मुंबई | नवीन मोटार सायकल | ४५००० | मागणीनुसार |
| १९ | श्री.डी.एन. कांबळे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. रत्नागिरी | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २० | श्री.के.बी. आचवल, लिपिक | प्रबंधक, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २१ | श्री.आर.आर.येवतीवाड, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २२ | श्री.सी.यू. मैड, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २३ | श्री.डी.पी. कदम, अधीक्षक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २४ | श्री.आर.एम. तुपकर, अधीक्षक | जि.व स.न्या. वर्धा | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| २५ | श्री.एम.एन. गावंडे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २६ | श्री.आर.पी. रंभाड, मुख्य बेलिफ | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २७ | श्री.ए.पी. आगलावे, पुस्तक बांधणीकार | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| २८ | श्री.एस.व्ही. दुर्गे, वाहन चालक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २९ | श्री.के.डी. ढवळे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३० | श्री.एम.एस. जोशी, लघुलेखक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३१ | श्री.एस.एस. दायमा, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३२ | श्रीमती एस.एस. दायमा, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | २८००० | नियमानुसार |
| ३३ | श्री.डी.डब्ल्यू. सुरडकर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३४ | श्री.एस.जी. साठे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. सातारा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३५ | श्री.एस.बी. देशपांडे, वाहन चालक | प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३६ | श्री.ए.एन. मोईन, वाहन चालक | प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४१४६० | मूळ वेतनानुसार |
| ३७ | श्री.एस.पी. शास्त्री, वाहन चालक | प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४२४८० | मूळ वेतनानुसार |
| ३८ | श्री.व्ही.के. काकडे, अधीक्षक | सह सचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३९ | श्री.व्ही.पी. बुचडे, शिपाई | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे | नवीन स्कूटी वेगो | २८००० | नियमानुसार |
| ४० | श्रीमती यू.के. कुबेर, लघुलेखक | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे | नवीन होन्डा ॲक्टीव्हा | २८००० | नियमानुसार |
| ४१ | श्रीमती के.आर. यादव, कनिष्ठ लिपिक | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| ४२ | श्री.एम.आर. ससाणे, वाहन चालक | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४३ | श्री.एस.पी. किणी, लिपिक टंकलेखक, स.व का.(अ.शा.) उ.न्या.मुंबई | वि.व न्या.वि. (का.आठ), मुंबई | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४४ | श्री.बी.एस. घुले, सहायक | प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४५ | श्री.एस.आर. मुळे, खासगी सचिव | प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद | नवीन मोटार कार | १५८४०० | मूळ वेतना नुसार |
| ४६ | श्री.एस.बी. जठार, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. अहमदनगर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| | | | **एकूण रुपये** | **२०१००४०** | |
| **(एकूण रुपये वीस लाख दहा हजार चाळीस फक्त)** | | | | | |

(बा.कि. रासकर)
शासनाचे अवर सचिव

**ता.क.** : संबंधित कार्यालयाने शिफारस केल्यानुसार शासकीय कर्मचा-यास अग्रिम प्रमाणित करण्यात आलेले आहे. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अग्रिम २०१०/प्र.क्र.१६/१०/विनियम, दि. १० जून,२०१० अनुसार नवीन वेतनश्रेणीनुसार ज्या कर्मचाऱ्याचे वेतन बँड मधील वेतन रु.८,५६०/- किंवा अधिक आहे अशा कर्मचाऱ्यांना, नवीन मोटार सायकल खरेदीसाठी कमाल रु.४५,०००/- आणि नवीन स्कूटर खरेदीसाठी कमाल रु.२८,०००/- इतके अग्रिम अनुज्ञेय आहे. तथापि, अर्जदाराचे **मूळ वेतन** हे सदर शासन निर्णयानसार विहित मर्यादेत आहे किंवा कसे याची खात्री केल्यानंतर, अर्जदाराने सादर केलेल्या कागदपत्रांच्या अनुषंगाने अर्जदारास अनुज्ञेय असेल तेवढेच अग्रिम मंजूर करण्यात यावे.